केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्यात कोरोना साथीच्या प्रादूर्भावामुळे राज्यातील शासनाची कामे करणाऱ्या कंत्राटदारांना चालू कंत्राटाबाबत सोसाव्या लागत असलेल्या अडचणींसंदर्भात उपाययोजना व सहाय्य करणे

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन पुरकपत्र क्र. संकीर्ण-१०२०/प्र.क्र.१००/२०२०/व्यय-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १४ ऑक्टोबर, २०२०

**वाचा - शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-१०२०/प्र.क्र.१००/२०२०/व्यय-१२, दि. २९ जुलै, २०२०**

**शासन पुरकपत्र:**

केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्यात कोरोना साथीच्या प्रादुर्भावामुळे राज्यातील शासनची कामे करणाऱ्या कंत्राटदारांना चालू कंत्राटाबाबत सोसाव्या लागत असलेल्या अडचणीसंदर्भात उपाययोजना व सहाय्य करण्याबाबत वित्त विभागाने निर्गमित केलेल्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये परिच्छेद क्र. १० मधील तरतूदीनुसार धोरणात्मक शंका अथवा अर्थविवरणाबाबत सचिव ( व्यय) वित्त विभाग यांच्या अध्यक्षतेखाली सचिव (बांधकामे) व सचिव (प्रकल्प समन्वय) यांचा समावेश असलेली समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर समिती त्यांची शिफारस अंतिम निर्णयार्थ अपर मुख्य सचिव (वित्त) यांना सादर करील. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचा या संबंधीचा निर्णय अंतिम असेल अशी तरतूद आहे.

२. सदर तरतूदीनुसार समितीने केलेल्या शिफारशीनुसार उक्त संदर्भाधीन शासनपरिपत्रकामध्ये खालीलप्रमाणे व अधिकच्या सूचना प्रस्तुत करण्यात येत आहे.

**(अ)** उक्त शासन परिपत्रकातील परिच्छेद २ मधील अ.क्र.१ मध्ये **शासकीय कामाच्या पूर्णत्वासाठी मुदतवाढीची विनंती कंत्राटदाराने केल्यास त्यास, दि. १५ मार्च, २०२० ते दि. १५ सप्टेंबर, २०२० अशी सहा महिन्यांची मुदतवाढ देण्यात आली होती. तथापि, या बाबत स्पष्ट करण्यात येते की, शासकीय कामाच्या पूर्णत्वासाठी मुदतवाढीची विनंती कंत्राटदाराने केल्यास त्या शासकीय कामांच्या पूर्णत्वासाठी कंत्राटातील नियमित व यापूर्वी शासन/विभागाने मान्य केलेल्या मुदतवाढीपेक्षा सहा महिने पर्यंत मुदतवाढ देण्यात येईल.**

**(ब)** सदर शासन परिपत्रकातील परिच्छेद २.१ (अ) मधील दुसऱ्या व तिसऱ्या ओळीतील वाक्य **" ७५ टक्के याऐवजी ९५ टक्के "** असे वाचण्यात यावे. तसेच

**(क)** सदर शासन परिपत्रकातील परिच्छेद २.१ (ब) मधील चौथ्या ओळीतील वाक्य **" दोष दायित्व निवारण कालावधीपर्यंत याऐवजी निविदेतील शर्तीत नमूद कालावधीपर्यंत "** असे वाचण्यात यावे.

**(ड)** तसेच उक्त शासन परिपत्रकातील परिच्छेद २ मधील अ.क्र.२.३ नंतर २.४ व २.५ खालील प्रमाणे वाचण्यात यावे.

**(२.४)** निधी अभावी प्रलंबित देयकांची रक्कम सुरक्षा ठेव रकमेपेक्षा जास्त असल्यास अशा प्रकरणी तशी नोंद देयकांमध्ये करण्यात यावी. कंत्राटदारास सुरक्षा अनामत परत करावी व त्यांच्या प्रलंबित देयकांमध्ये सुरक्षा अनामत इतक्या रकमेचा हिशोब ठेवावा व निधी प्राप्त झाल्यावर सुरक्षा ठेव रकमेची भरपाई शासनाकडे / विभागाकडे करण्यात यावी.

**(२.५)** पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने त्यांच्या कामांच्या निविदा तरतूदींना बाधा न येता अनामत रकमा परत करण्यासंबंधीची कार्यवाही करावी.

**(इ)** तसेच उक्त शासन परिपत्रकातील परिच्छेद ३ मधील अनुक्रमांक ३.३ नंतर ३.४ खालील प्रमाणे वाचण्यात यावे.

**(३.४)** सदर अतिरिक्त सुरक्षा अनामत रक्कम (Additional Performance Security Deposit) १०० टक्के काम पूर्ण झाल्यानंतर दोष दायित्व कालावधी पूर्ण होण्याची वाट न पहाता, परत करण्यात यावी.

सदर शासन पुरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्यांचा संगणक सांकेतांक २०२०१०१४१३३९२७९६०५ असा आहे. हे शासन पुरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK RAMBHAJI DAHIPHALE

Digitally signed by VIVEK RAMBHAJI DAHIPHALE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=56142975484e58364afe88f5f0e3138e3ce0d4e4058e42f003dfd69500064afb, serialNumber=3981a50612646983d580dea2da5fb52a33d8e6e3c4f34cd80f08c598711ceb65, cn=VIVEK RAMBHAJI DAHIPHALE
Date: 2020.10.14 16:41:17 +05'30'

**( वि. र. दहिफळे )**

**सहसचिव (व्यय), वित्त विभाग**

**प्रत,**

०१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

०२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.

०३. राज्यपालांचे सचिव

०४. मुख्यमंत्र्यांचे सचिव

०५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

०६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग

०७. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख

०८.प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई

०९. प्रधान महालेखापाल (लेखी परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई

१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, नागपूर

११. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र नागपूर

१३.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२

१४.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१

१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई

१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई

१७. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई

१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई

२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदर, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली

२२. सर्व विभागीय आयुक्त

२३. सर्व जिल्हाधिकारी

२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

२५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२७. महासंचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती

२८.संचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा, कोकण भवन, नवी मुंबई

२९. सह संचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती

३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने

३१.निवड नस्ती व्यय-१२.